**सन २०२३-२४ करिता अन्न आणि पोषण सुरक्षा अंतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) करिता अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी तिस-या हप्त्याचा एकूण ₹२५.२८३३३ लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : अपोसु-२०२३/प्र.क्र.८८/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

संदर्भ:-

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/१७-अे, दि.१९ एप्रिल, २०१७
२. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.संकीर्ण-०९१९/प्र.क्र.२२१/१४-अे, दि.०४ नोव्हेंबर, २०२०
३. वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२ एप्रिल, २०२३
४. शासन पत्र क्र.RKY-०१२३/C.R.१३/१४-A, दि.३० मे, २०२३
५. केंद्र शासनाचे पत्र क्र.F.NO.२०/२०१७-NFSM(CA-V), दि.२१ जून, २०२३
६. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. विप्र-३/राअसुपोअ/कापूस/२०९९४/२३, दि.२२ जून, २०२३
७. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. विप्र-३/राअसुपोअ/कापूस/२१७६३/२३, दि.३० जून, २०२३
८. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.अपोसु-२०२३/प्र.क्र.६९/४अे, दि.०५ जुलै, २०२३
९. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. विप्र-३/राअसुपोअ.कापूस/अनु./२२२८२/२३, दि.०५ जुलै, २०२३
१०. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.अपोसु-२०२३/प्र.क्र.८८/४अे, दि.०१ सप्टेंबर, २०२३
११. केंद्र शासनाचे पत्र क्र.F.NO.२०-२७/२०१७-NFSM(CA-V), दि.२६ ऑक्टोबर, २०२३
१२. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. विप्र-३/अपोसु.कापूस/अनु./३५६४०/२३, दि.०७ नोव्हेंबर, २०२३
१३. आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय क्र, बीयुडी-२०२३/प्र.क्र.०७/कार्या-७, दि.१७.०१.२०२४
१४. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.अपोसु-२०२३/प्र.क्र.८८/४-अे, दि.१९ जानेवारी, २०२३
१५. वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८ डिसेंबर, २०२३
१६. केंद्र शासनाचे पत्र क्र.F.NO.२०-२७/२०१७-NFSM(CA-V), दि.११ मार्च, २०२४
१७. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. विप्र-३/अपोसु.कापूस/अनु./१०३४३/२३, दि.३० मार्च, २०२४
१८. कृषि आयुक्तालयाचे पत्र जा.क्र. विप्र-३/अपोसु.कापूस/अनु./१०३६२/२३, दि.३० मार्च, २०२४

प्रस्तावना :-

सन २०२३-२४ करिता अन्न आणि पोषण सुरक्षा अंतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) करिता एकूण रु.११६२.०४ लाख (सन २०२२-२३च्या प्रलंबित दायित्वासह) रकमेच्या वार्षिक कृती आराखड्यास राज्य स्तरीय समितीने संदर्भाकिंत दि. ३० मे, २०२३ च्या शासन पत्रान्वये मंजूरी प्रदान केली आहे. सदर कृती आराखडयास संदर्भाकिंत दि.०५ जुलै, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

अन्न आणि पोषण सुरक्षा अंतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) करिता पहिल्या हप्त्यापोटी केंद्र शासनाने संदर्भाकिंत दि.२१ जून, २०२३ च्या पत्रान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिस्सा एकूण रु.१६.३८००० लाख एवढा निधी वितरीत केला आहे. त्याअनुषंगाने संदर्भाकिंत दि.०१ सप्टेंबर, २०२३ च्या शासन निर्णयान्वये केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण रु.२७.३०००० लाख निधी वितरीत केला आहे. तसेच सदर योजनेतंर्गत दुस-या हप्त्यापोटी केंद्र शासनाने संदर्भाकिंत दि.२६ ऑक्टोबर, २०२३ पत्रान्वये अनुसूचित जमाती प्रवर्गाचा केंद्र हिस्सा एकूण रु.१६.३९००० लाख एवढा निधी वितरीत केला आहे. त्याअनुषंगाने संदर्भाकिंत दि.१९ जानेवारी, २०२४ च्या शासन निर्णयान्वये केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण रु.२७.३१६६७ लाख निधी वितरीत केला आहे.

आता, सन २०२३-२४ करिता केंद्र शासनाने अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता अन्न आणि पोषण सुरक्षा अंतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) करिता तिस-या हप्त्यापोटी एकूण केंद्र हिस्याचा ₹ १६.३९ लाख निधी संदर्भाकिंत दि.११ मार्च, २०२४ रोजी पिकनिहाय वितरीत केलेला आहे. त्यापैकी योजनेच्या लेखाशीर्षाखाली अर्थसंकल्पीय तरतुदीच्या मर्यादेत तसेच PFMS प्रणालीवर गतवर्षीचा शिल्लक निधी विचारात घेवून कृषि आयुक्तालयाने संदर्भाकिंत दि.३०/०३/२०२४ च्या पत्रांन्वये केलेल्या मागणीप्रमाणे अनुसूचित जमाती प्रवर्गाकरीता अन्न आणि पोषण सुरक्षा अंतर्गत वाणिज्यिक पिके (कापूस, ऊस) करिता प्राप्त झालेला **केंद्र हिस्स्याचा १५.१७००० लाख व राज्य हिस्याचा ₹ १०.११३३३ लाख असा एकूण २५.२८३३३ लाख निधी**, वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०२३-२४ मध्ये वाणिज्यिक पिके करिता (ऊस ,कापूस) **अनुसूचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र व राज्य हिस्स्याचा एकूण ₹ २५.२८३३३ लाख निधी (रुपये पंचविस लाख अठ्ठावीस हजार तीनशे तेहतीस फक्त)** आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचे पीक निहाय तसेच केंद्र व राज्य हिस्स्याचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

(₹ लाख)

| अ.क्र. | पिके | अनुसूचित जमाती प्रवर्ग | | एकूण वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| | | केंद्र हिस्सा (६०%) | राज्य हिस्सा (४०%) | |
| १. | कापूस | ९.४८००० | ६.३२००० | १५.८०००० |
| २. | ऊस | ५.६९००० | ३.७९३३३ | ९.४८३३३ |
| | **एकूण** | **१५.१७०००** | **१०.११३३३** | **२५.२८३३३** |

२. परिच्छेद १ मध्ये नमूद केल्यानुसार **कापूस पिकांकरिता** केंद्र हिस्स्याचा ₹९.४८००० लाख निधी (रुपये नऊ लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹६.३२००० लाख निधी ( रुपये सहा लाख बत्तीस हजार फक्त) असा एकूण रु.१५.८०००० लक्ष निधी ( रुपये पंधरा लाख ऐंशी हजार फक्त) वितरीत करण्यात येत आहे .

३. परिच्छेद १ मध्ये नमूद केल्यानुसार **ऊस पिकांकरिता** केंद्र हिस्स्याचा ₹ ५.६९००० लाख निधी (रुपये पाच लाख एकोणसत्तर हजार फक्त) आणि राज्य हिस्स्याचा ₹ ३.७९३३३ लाख निधी ( रुपये तीन लाख एकोणऐंशी हजार तीनशे तेहतीस फक्त ) असा एकूण ₹ ९.४८३३३ लाख निधी ( रुपये नऊ लाख अठ्ठेचाळीस हजार तीनशे तेहतीस फक्त ) वितरीत करण्यात येत आहे.

४. परिच्छेद क्र. १ ते ३ मध्ये नमूद केल्यानुसार, कापूस, ऊस या पिकांकरिता वितरीत केलेला अनुसूचित जमाती प्रवर्गाचा निधी सन २०२३-२४ मध्ये पुढील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकावा:-

| **केंद्र/ राज्य हिस्सा** | **लेखाशिर्ष अनुसूचित जमाती प्रवर्ग** | |
|---|---|---|
| | **कापूस** | **ऊस** |
| केंद्र हिस्सा | मागणी क्रमांक ,टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(२३) कृषि उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके (कापूस) (केंद्र पुरस्कृत योजना)(केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१ A५७५) (कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक, टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२५) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके (ऊस) (केंद्र पुरस्कृत योजना) (केंद्र हिस्सा ६०%)<br>(२४०१ A५९३) (कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |
| राज्य हिस्सा | मागणी क्रमांक, टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(०१) (२४) कृषि उन्नती योजना -राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान- व्यापारी पिके (कापूस) (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४०%)<br>(२४०१ A५८४) (कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक, टी-५<br>२४०१- पीक संवर्धन<br>७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना<br>(२६) कृषि उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-व्यापारी पिके (ऊस) (केंद्र पुरस्कृत योजना)(राज्य हिस्सा ४०%)<br>(२४०१ A६०१) (कार्यक्रम) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |

५. सन २०२३-२४ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी खालीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|
| आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि),<br>कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |

६. केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२३ मार्च, २०२१ च्या ज्ञापनाद्वारे PFMS प्रणालीच्या सुधारीत कार्यपध्दतीनुसार व संदर्भाधीन दि ०२.ऑगस्ट , २०२१ च्या शासन निर्णयान्वये केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापनासाठी राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियानातंर्गत वाणिज्यिक पिके ही योजना SNA मार्क करण्यात आली आहे

७. शासन निर्णयान्वये अन्न आणि पोषण सुरक्षा अंतर्गत वाणिज्यिक पिके (ऊस ,कापूस) करिता उपलब्ध करुन दिलेल्या एकूण ₹२५.२८३३३ लाख निधी संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी PFMS प्रणालीवर जिल्हा निहाय खर्चाची मर्यादा निश्चित करावी.

८. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

९. शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८ डिसेंबर, २०२३ नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३३११८१२०८५१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANTOSH BANSIRAO KARAD

Digitally signed by SANTOSH BANSIRAO KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f981d5a9fec2e5d5dc36f39695b5f0e4ff5b340cd5420df7cbaa28990d692e36, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=90BBB9D3E7E74DE43F8070E2A9A65BFD42747F1995A4F22FDC0240939AAB0835, cn=SANTOSH BANSIRAO KARAD
Date: 2024.03.31 18:24:38 +05'30'

**(संतोष कराड)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मा. मंत्री (कृषि)यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई,
२. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई,
३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई,
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
५. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२. सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
१३. सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
१४. महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८. सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१९. वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०. निवड नस्ती-४अे